सार्वजनिक बांधकाम विभागातील इमारत प्रकल्पांची अंदाजपत्रके तयार करत असताना अनुसरण्यात यावयाच्या कार्यपध्दतीबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सीएटी-०३/२०१५/प्र.क्र.६०/इमारती-२**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
दिनांक : ३०/६/२०१५

**संदर्भ :-** (१) B & C Department No. BDG-३८७०-K dt. २-४-७३
(२) PW& H Department No. L&JD/CCB-४१७५/२३२५-Dsk.VI dt.१६-९-७५
(३) Edu & Youth Services Depᵗ Corrigendum No. ODO-२१७६/१५०४४ (४३४) XXIX dt. ७-६-७७
(४) शासन पत्र सा.बां.वि.क्र. एसएचआर १६८२/१४८७४/सीआर-२३८५/नियोजन-३ दिनांक २१/७/१९८३
(५) शासन परिपत्रक सा.बां.वि.क्र. बीडीजी १०८४/९१७/इमारती-३ दिनांक ९/३/१९८४
(६) शासन परिपत्रक सा.बां.वि.क्र. बीडीजी १०८४/सीआर-१९/इमारती-२ दिनांक ४/८/१९८४
(७) शासन परिपत्रक सा.बां.वि.क्र. योजना १०८५/प्र.क्र.१०१६६/नियोजन-१ दिनांक १०/९/१९८४
(८) शासन परिपत्रक सा.बां.वि.क्र. आरआरएम १०८५/सीआर-४६७० नियोजन-३ दिनांक १३/२/१९८५
(९) P.W.Department Circular No.GEN-१०९०/CR.१२/Bldg.२ dt.२०-४-९०
(१०) शासन परिपत्रक सा.बां.वि.क्र. बीडीजी १०८९/सीआर-१०२/इमारती-२ दिनांक ७/८/१९९०
(११) शासन परिपत्रक सा.बां.वि.क्र. आयएनएस १०९०/सीआर-४/मिंव्य-३ दिनांक २९/८/१९९०
(१२) शासन परिपत्रक सा.बां.वि.क्र. बीडीजी १०८९/सीआर-१०२/इमारती-२ दिनांक २/१/१९९२
(१३) शासन परिपत्रक सा.बां.वि.क्र. जीईएन.१०९६/प्र.क्र.१४/नियोजन-३ दिनांक १५/४/१९९६
(१४) शासन परिपत्रक सा.बां.वि.क्र. सुप्रमा १०/२००१/प्र.क्र.३२२/रस्ते-५ दिनांक ९/११/२००१
(१५) शासन पत्र सा.बां.वि.क्र. सुप्रमा-२००७/प्र.क्र.५२२/रस्ते-५ दिनांक ७/१२/२००७

**प्रस्तावना :**

सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत शासनाच्या इमारतींची मूळ बांधकामे, परिक्षण आणि दुरुस्ती, रस्ते/पुलांची बांधकामे व दुरुस्तीची कामे हाती घेण्यात येऊन पूर्ण करण्यात येतात. या प्रकल्पांची कामे हाती घेण्यासाठी प्रकल्पांची सविस्तर अंदाजपत्रक व नकाशे तयार करण्याचे काम सार्वजनिक बांधकाम विभागाच्या क्षेत्रिय स्तरावरील अधिका-यांमार्फत करण्यात येते. अंदाजपत्रके तयार करताना प्रकल्पाची सविस्तर माहिती घेऊन सखोल सर्व्हेक्षण करुन आवश्यक असेल तेथे

संकल्पने निश्चित करुन अंदाजपत्रके तयार करण्याचे काम करणे अपेक्षित आहे. प्रकल्पांसाठी अंदाजपत्रके व नकाशे तयार करताना कोणती पध्दती अनुसरावी तसेच कोणती काळजी घ्यावी यासंदर्भात शासनाने वेळोवेळी मार्गदर्शक सूचना संदर्भाधीन शासन निर्णय/शासन परिपत्रकान्वये निर्गमित केल्या आहेत. या सूचनांचे पालन क्षेत्रिय स्तरावरील अधिका-यांकडून होत नसल्याची बाब शासनाच्या निदर्शनास आली आहे. यामुळे प्रकल्पांची अंदाजपत्रके योग्यरितीने न केल्याने आर्थिक व्यवस्थापन करताना अडचणीचे होत आहे. तसेच अंदाजपत्रके योग्य नसल्याने कामांच्या निविदा प्रक्रियेमध्ये अडचणी उद्भवण्याचे प्रमाण वाढले आहे. प्रकल्पांची कामे यामुळे विहित कालमर्यादेत पूर्ण करणे शक्य होत नसल्याने प्रकल्पांच्या किंमतीत वाढ होऊन शासनास आर्थिक बोजा स्विकारावा लागत आहे.

२. जनहित याचिका क्र.२८/२०१० च्या अनुषंगाने न्यायालयाने शासनाने काही बाबी स्पष्ट करावयाच्या सूचना दिलेल्या आहेत. याच अनुषंगाने नागपूर कंत्राटदार असोसिएशन यांनी शासनस्तरावर काही सुधारणा करण्याबाबत न्यायालयास सूचविले आहे. यासंदर्भात रिट याचिका क्र. २८/२०१० संदर्भात न्यायालयाने दिलेल्या निर्देशाप्रमाणे शासनाच्या दिनांक २/१२/२०१४ रोजीच्या शासन निर्णयाद्वारे अभ्यासगटाची नियुक्ती केली आहे. या अभ्यासगटाचा अहवाल शासनास प्राप्त झाला आहे. या समितीने केलेल्या शिफारशीसंदर्भात सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अखत्यारीतील सर्व प्रादेशिक विभागाच्या मुख्य अभियंत्यांसोबत दिनांक १२/३/२०१५ रोजी झालेल्या बैठकीमध्ये या शिफारशींवर सविस्तर विचारविनिमय करण्यात आला. बैठकीस उपस्थित सर्व मुख्य अभियंतांनी त्यांचे अभिप्राय बैठकीमध्ये नमूद केले. या बैठकीमध्ये सर्वानुमते समितीने केलेल्या शिफारशींमधील काही महत्त्वाच्या बाबींबाबत न्यायालयाच्या निर्देशांप्रमाणे मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्याचे ठरले. त्यास अनुसरुन अभ्यासगटाने केलेल्या शिफारशींच्या अनुषंगाने सार्वजनिक बांधकाम विभागामध्ये प्रचलित असलेल्या कार्यपध्दतीत काही सुधारणा करण्याबाबत शासनाने निर्णय घेतला आहे :-

**<u>शासन निर्णय</u>** :-

सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत प्रकल्पांची अंदाजपत्रके तयार करत असताना खालील बाबींबाबत लक्ष देऊन कार्यवाही करण्यात यावी :-

(१) कोणत्याही प्रकल्पाचे अंदाजपत्रक तयार करताना सखोल सर्वेक्षण, भूस्तर सर्वेक्षण, संरचना संकल्पन करुन त्यातील प्राप्त निष्कर्षानुसार अंदाजपत्रक तयार करण्यात यावे.

(२) इमारतींच्या प्रकल्पांची अंदाजपत्रके तयार करताना इमारत उपयोगात आणण्यासाठी आवश्यक पाणीपुरवठा, विद्युतीकरण, मलनि:स्सारण व जलनि:स्सारण व्यवस्था, भूखंड विकास, संरक्षक भिंती, अग्निप्रतिबंधक उपाययोजना, वातानुकूलित यंत्रणा, अंतर्गत रस्ते व उपभोक्ता विभागास आवश्यकता असलेल्या सर्व बाबींचा समावेश अंदाजपत्रकामध्ये करण्यात यावा.

(३) शासन सार्वजनिक बांधकाम विभागाने सन १९९१ मध्ये इमारती दुरुस्तीबाबत मार्गदर्शक तत्वे निर्गमित केली आहेत. या मार्गदर्शक तत्वानुसार दुरुस्ती व देखभालीची मानके (Norms) तसेच दुरुस्ती प्रकार (Type of repair) याचा सखोल विचार करुन इमारत प्रकल्पांची अंदाजपत्रके तयार करावीत.

(४) कामाच्या जागी असलेल्या वस्तुस्थितीशी सुसंगत अंदाजपत्रक तयार करणेबाबत काळजी घेतल्यानंतर कोणत्याही परिस्थितीत प्रकल्पाच्या किंमतीत अवाजवी वाढ अथवा घट होणार नाही याबाबत क्षेत्रिय अधिका-यांनी कटाक्षाने काळजी घ्यावी.

(५) प्रकल्पाच्या कामाचा वाव उपभोक्ता विभागाच्या लेखी सहमतीने व प्रतिस्वाक्षरीने अंतिम करावा. उपभोक्ता विभागाने कामाच्या व्याप्तीमध्ये तसेच कामाच्या विविध घटकांच्या विर्निदेशांमध्ये प्रस्तावित केलेल्या तपशिलात सदर बाबी शासनाच्या मार्गदर्शक सूचनांप्रमाणे योग्य असल्याबाबत प्रमाणित करावे. तसेच अशा प्रस्तावास शासकीय वास्तुशास्त्रज्ञ व अन्य आवश्यक सक्षम अधिका-या कडून मान्यता प्राप्त करुन घ्यावी.

(६) प्रकल्पाच्या अंतर्गत येणा-या सर्व घटक भागांसाठी सविस्तर संकल्पने व आराखडे सक्षम अधिका-याकडून मंजुर करुन घेण्यात यावी. यासाठी आवश्यक असल्यास सखोल सर्वेक्षण करण्यात यावे. तद्नंतरच प्रकल्पाचे सविस्तर अंदाजपत्रक तयार करण्यात यावे.

(७) उपरोक्त सूचनांचे पालन करुन प्रकल्पाचे सविस्तर अंदाजपत्रक तयार करुन त्यास सक्षम अधिका-याकडून तांत्रिक तपासणी करण्यात यावी. प्रस्तूत तांत्रिक मान्यता प्राप्त झाल्यावर त्यावर आधारित प्रशासकीय मान्यता प्राप्त होण्यासाठी प्रस्ताव सादर करण्यात यावा.

(८) शासनाने इमारती/रस्ते/पूल बांधकामांची अंदाजपत्रके व नकाशे तयार करण्याबाबत यापूर्वी वरील सर्व सूचना आणि इमारती/रस्ते आणि पुलांच्या संदर्भाधीन व वेळोवेळी निर्गमित केलेल्या अन्य शासन निर्णय व शासन परिपत्रकान्वये निर्गमित केलेल्या सूचनांप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलबध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०८०४१३०२१५८६१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vidyadhar Dinkar Sardeshmukh

Digitally signed by Vidyadhar Dinkar Sardeshmukh
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vidyadhar Dinkar Sardeshmukh
Date: 2015.08.04 13:06:11 +05'30'

**( वि.दि.सरदेशमुख )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१.सर्व मुख्य अभियंता सा.बां.प्रादेशिक विभाग
२.मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, मुंबई
३.सर्व अधिक्षक अभियंता,सा.बां. मंडळ
४.सर्व कार्यकारी अभियंता, सा.बां.विभाग
५.सर्व मंत्रालयीन विभाग
६. स्वीय सहाय्यक, अपर मुख्य सचिव (सा.बां)/ सचिव (बांधकामे)/सचिव (रस्ते), सा.बां.विभाग, मुंबई
७.निवडनस्ती, इमारती-२ सा.बां.वि. मंत्रालय